राज्यातील अल्पसंख्याकांच्या समस्यांबाबत संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी देण्याकरिता अनुदान वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः . अविवि- २०१५ /प्र.क्र.१२५ /का-९**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक - २५ जून, २०१५

वाचा: १. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२००९/प्र.क्र.५७/०९/का-१, दि. ०५ फेब्रुवारी, २००९,
२. शासन परिपत्रक, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.बियुडी-२०१४/प्र.क्र. १४८(भाग-२) /का.७, दि.२१/०४/२०१५
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं -२०१५ /प्र.क्र.८५ /अर्थ.३ , दि.१७/०४/२०१५
४. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांचे पत्र क्र. राअआ/संकिर्ण/ २०१५/९९९, दि.१५ /०६ /२०१५.

**शासन निर्णय :-**

**संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये, "राज्यातील अल्पसंख्याकांच्या समस्यांबाबत संशोधन, अल्पसंख्याकांशी निगडीत बाबी हाताळणारे प्रशासनातील अधिकारी / कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण व राज्य शासनाने अल्पसंख्याकांसाठी घोषित केलेल्या योजनांना प्रसिध्दी"ही योजना कार्यान्वित करण्यात आली आहे.** सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात या योजनेच्या अंमलबजावणीसाठी "मागणी क्र. झेड ई-१, मुख्य लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाज कल्याण २००, इतर कार्यक्रम , राज्य योजनेंतर्गत योजना (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१) (१२) संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी या करिता सहायक अनुदान (२२३५-ए-१८७) या लेखाशीर्षाखाली रु. ४ कोटी इतका नियतव्यय मान्य असून, चालू वर्षामध्ये रु. २,८०,००,०००/- (रु. दोन कोटी ऐंशी लक्ष फक्त) निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. उपरोक्त संदर्भ क्र. २ व ३ येथील परिपत्रकानुसार सन २०१५-१६ या वर्षातील एकूण अर्थयंकल्पित निधीचा ७०% मर्यादेपर्यंत योजनाअंतर्गत बाबीसाठी निधी वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

२. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने संदर्भ क्र. ४ येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुसरुन सन २०१५-१६ या वर्षात अल्पसंख्याकांच्या समस्यांबाबत संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी देणे या योजनेच्या अंमलबजावणीकरीता अर्थसंकल्पित तरतूदीच्या ७०% मर्यादेपर्यंत रु.१,९६,००,०००/- (रुपये एक कोटी शहाण्णव लक्ष फक्त) एवढी रक्कम वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्या स्वाधीन करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांना सन २०१५-१६ करिता मंजूर करण्यात आलेल्या एकूण रु.१,९६,००,०००/- (रुपये एक कोटी शहाण्णव लक्ष फक्त) एवढया निधीच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे, या आदेशान्वये वितरित करण्यात आलेल्या रकमेतून केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने शासनास सादर करावे. सदरहू अनुदान वितरीत करताना वित्तीय नियम /विनियम/शासन निर्णय महालेखाकार यांचे निरीक्षण अहवाल इ.ची तपासणी करुन आयोगाने अनुदान वितरित करावे त्याचप्रमाणे संदर्भ क्र.३ येथील दिनांक १७.०४.२०१५ च्या शासन परिपत्रकाव्दारे निधी वितरणाबाबत विहीत केलेल्या सर्व अटी व शर्तीचे पालन करण्याची जबाबदारी सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगावर राहील.

४. या योजनेंतर्गत होणारा खर्च मागणी क्र. झेड ई-१, मुख्य लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाज कल्याण २०० व इतर कार्यक्रम २००इतर कार्यक्रम, राज्य योजनेंतर्गत योजना (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१) (०१२) संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी याकरिता सहायक अनुदान (२२३५-ए-१८७) या लेशाशीर्षाखालील सन २०१५-१६ या वर्षाकरिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या संदर्भ क्र. ३ येथील दि.१७/०४/२०१५ रोजी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून,त्याचा संगणक सांकेताक २०१५०६२६१६५८०४८७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Hari Gaikwad

Digitally signed by Ashok Hari Gaikwad
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Hari Gaikwad
Date: 2015.06.26 17:00:16 +05'30'

**(अशोक गायकवाड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१ सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोग, मुंबई.
२ महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखावअनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
३ महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
४ अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई,
५ निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६ नियोजन विभाग (१४७५)/ वित्त विभाग (व्यय-४)
७ अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
8 निवडनस्ती.